एकात्मिक बाल विकास सेवा योजने अंतर्गत आधार नोंदणी करण्यासाठी आधार नोंदणी साहित्य संच खरेदी करिता निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१८/प्र.क्र.४०९(भाग-१)/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १५ नोव्हेंबर, २०२१

वाचा:-

१. महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्रमांक एबावि-२०१८/प्र.क्र.४०९/का.६, दिनांक ०६.१२.२०१८
२. महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्रमांक एबावि-२०१८/प्र.क्र.४०९(भाग-१)/का.६, दिनांक १७.०३.२०२१
३. वित्त विभाग शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४.१०.२०२१

शासन निर्णय:-

केंद्र शासनाने एकात्मिक बाल विकास सेवा योजनेमधील प्रत्येक प्रकल्प कार्यालयामधील ३ आधार नोंदणी संच उपलब्ध करून देऊन कायम स्वरुपाचे आधार नोंदणी केंद्र स्थापित करणेबाबत निर्देशित केलेले आहे. त्यानुसार विभागाने वाचा क्र.१ येथील शासन निर्णयान्वये प्रत्येक प्रकल्प कार्यालयास ३ आधार नोंदणी संच याप्रमाणे १६५९ आधार नोंदणी संच खरेदी करण्यास शासन मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार वाचा क्र.२ येथील शासन निर्णयान्वये आधार नोंदणी साहित्य संच खरेदी करण्यास दिलेल्या प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात खालील विवरणपत्रातील रकाना क्रमांक-१ मधील प्रधान लेखाशीर्ष/उपशीर्ष/उद्दिष्टामध्ये रकाना क्रमांक-२ मध्ये नमूद अर्थसंकल्पित तरतुदीमधून रकाना क्रमांक-३ मध्ये दर्शविल्यानुसार एकुण रुपये ११४०.०० लाख एवढा निधी वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| लेखाशीर्ष | अर्थसंकल्पित तरतूद २०२१-२२ | प्रस्तावित वितरण |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| २२३६-पोषण आहार<br>०२-पोषक अन्न व पेये यांचे वितरण<br>१०१-विशेष पोषण आहार कार्यक्रम<br>(१०)- अंगणवाडीमध्ये सोयी सुविधा पुरविणे<br>(१०)(०५)अंगणवाडीमधील लाभार्थ्यांची नोंदणी करण्यासाठी आधार नोंदणी मशीन खरेदी करणे.<br>(केंद्र हिस्सा ६०% )(कार्यक्रम)<br>(२२३६ २०६६)<br>५०-इतर खर्च | १३६८.०० | ६८४.०० |
| १०)(०६) अंगणवाडीमधील लाभार्थ्यांची नोंदणी करण्यासाठी आधार नोंदणी मशीन खरेदी करणे.<br>(राज्य हिस्सा ४०% )(कार्यक्रम)<br>(२२३६ २०७५)<br>५०-इतर खर्च | ९१२.०० | ४५६.०० |
| **एकूण** | **२२८०.००** | **११४०.००** |

२. सदर शासन निर्णय वाचा क्र. ३ येथील वित्त विभागाच्या दिनांक १४.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयामधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१११११२२२५८६३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VARUDKAR MAHESH ASHOKRAO

Digitally signed by VARUDKAR MAHESH ASHOKRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d93c4961d98086877a4048296211d7af97ecfd40d7967c43d20b360d83ce0fa6, pseudonym=58C42BF9F3ABBB1C15CFBC42D0AA8503E42564DB, serialNumber=7EBBBC3712E8D459EF90BF7AAE4EA46E9CAEBDD50CFECDE2EE7CE0454FA0416A, cn=VARUDKAR MAHESH ASHOKRAO
Date: 2021.11.17 16:09:09 +05'30'

**( महेश वरूडकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता),(लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.
३) मा. मंत्री (म. व बा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
५) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास.
६) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी(महिला व बाल विकास),जिल्हा परिषद
७) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रामीण/नागरी/आदिवासी) प्रकल्प
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१०) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई.
११) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का.१४७२) / वित्त विभाग (व्यय-६/ अर्थ-७), मंत्रालय, मुंबई
१२) कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवड नस्ती -का-६.